**साखळी क्रमांक नियमित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण २०१६/प्र.क्र.८३/नियोजन-२**
**मंत्रालय,मुंबई-४०००३२**
**दिनांक:- ०२/०१/२०१७.**

**संदर्भ:- एस-९२/१११३/प्र.क्र.१४/सेवा-६ (ड), दि.२३/१२/२०१६.**

**प्रस्तावना :-**

मा. उप लोक आयुक्त महाराष्ट्र राज्य यांचेकडे श्री. आण्णा किसनराव मोरे यांनी दाखल केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने दि. २०.१२.२०१६ रोजीच्या सुनावणीत मा. उप लोक आयुक्त यांचेकडून रस्ते विकास योजना २००१-२०२१ नुसार साखळी क्रमांक नियमित करण्याचे निर्देश दिले आहेत. या अनुषंगाने शासन परिपत्रक निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**परिपत्रक :-**

महाराष्ट्रातील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अंतर्गत देखभाल दुरूस्तीसाठी येत असलेल्या प्रमुख राज्यमार्ग, राज्यमार्ग, प्रमुख जिल्हामार्ग इ. रस्त्यांचे साखळी क्रमांक हे रस्ते विकास योजना आराखडा १९८१-२००१ नुसार किंवा स्थानिक स्तरावर म्हणजेच जिल्हा / तालुका / उपविभाग / शाखा निहाय देण्यात येत होते. त्यामुळे सदर राज्य मार्ग किंवा जिल्हा मार्गची एकूण लांबी ही कुठल्या साखळी क्रमांकापासून होते व कुठे संपते यांचा स्वयंस्पष्ट बोध होत नव्हता. तसेच एकाच साखळी क्रमांकाची विविध शाखा / उपविभाग / विभाग / जिल्हा इ. मध्ये पुनरावृत्ती दिसून विभागाच्या कार्यपध्दतीबाबत साशंकता निर्माण होत असे.

रस्ते विकास योजना २००१-२०२१ ही सन २०१२ पासून कार्यान्वित करण्यात आलेली आहे. रस्ते विकास योजना २००१-२०२१ नुसार राज्य मार्ग, जिल्हा मार्ग, इतर जिल्हा मार्ग इ. रस्त्यांची लांबी / साखळी क्रमांक सलग घेणे आवश्यक आहे. या विभागाच्या रोड इन्फर्मेशन सिस्टिम मध्ये अशाप्रकारे सलग साखळी क्रमांक प्रत्येक विभागीय कार्यालयामार्फत नोंदविण्यात आलेले आहेत. तरी यापुढील सर्व शासकीय कामकाज (उदा. अर्थसंकल्पात काम समाविष्ट करणे, प्रशासकीय मान्यतेचे अंदाजपत्रक सादर करणे, तांत्रिक मान्यता, निविदा तसेच देयके इ. कामामध्ये) रस्ते विकास योजना २००१-२०२१ नुसार मंजूर असलेले साखळी क्रमांक घेण्यात यावेत, याची कृपया कटाक्षाने नोंद घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०२१६१०३४६०१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swaroop T
Raipure

Digitally signed by Swaroop T Raipure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PWD DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2923930fb1a491b85ab7752c1dc4f2e3b8db33e2a8a322ed2dcfb496a3a97175, cn=Swaroop T Raipure
Date: 2017.01.02 16:15:18 +05'30'

**(स्वरूप रायपुरे)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
२) सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
४) सर्व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद